**प्रादेशिक योजना - जळगांव - भुसावळ**
**मौजे कुसुंबे मधील गट क्र. २३० मधील २१.२८ हेक्टर क्षेत्र औद्योगिक विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २०(४) अन्वये फेरबदल मंजुर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. टिपीएस-३५०९/१७१३/प्र.क्र.२५७/०९/नवि-९**
**मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांकः १३ नोव्हेंबर, २००९**

**शासन निर्णयः-** सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या कार्यासन अधिकारी

( प्रदीप गोहिल )
कार्यासन अधिकारी

प्रति,
१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, जळगांव
४) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
(यांना विनंती की, सोबतच्या अधिसुचनेनुसार भाग नकाशाच्या ३ प्रती अधिप्रमाणित करणेसाठी पाठवाव्यात.)
६) सहायक संचालक नगर रचना, जळगांव शाखा, जळगांव
७) व्यवस्थापक शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, येरवडा कारागृह, पुणे
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-१, मध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी ०५ प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ व उपसंचालक नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक यांना पाठवाव्यात)
८) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसुचना शासकीय वेब साईटवर प्रसिध्द करण्यात यावी.
९) निवडनस्ती-(नवि-९)

Paldhi 20(4)

**अधिसूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- १३ नोव्हेंबर, २००९**

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६.**

क्रमांक:टिपीएस-३५०९/१७१३/प्र.क्र.२५७/०९/नवि-९:- ज्याअर्थी, जळगांव-भुसावळ प्रादेशिक योजना (यापुढे "उक्त प्रादेशिक योजना" असे संबोधिले आहे) शासनाच्या नगर विकास विभागाने महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र ३७ वा) (यापुढे उक्त अधिनियम असे संबोधिले आहे) चे कलम १५(१) अन्वये अधिसूचना क्र. टिपीएस-३५८५/११६/ प्र.क्र.१६५/नवि-९, दिनांक १२ नोव्हेंबर, १९९१ अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १ फेब्रुवारी, १९९२ पासून अंमलात आलेली आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेतील जळगांव परिसर नकाशात मौजे कुसुंबे येथील गट क्र. २३० मधील २१.२८ हेक्टर क्षेत्र औद्योगिक विभागात समाविष्ट आहे (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे) ;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २०, पोटकलम-२ मधील तरतुदीनुसार उक्त प्रादेशिक योजनेमधील उक्त क्षेत्र औद्योगिक विभागातून वगळून खालील अटींच्या अधिन राहून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याबाबत शासनाचे मत झाले आहे (यापुढे "उक्त फेरबदल" असे संबोधिले आहे)

अट - १) सदर फेरबदलाच्या जागेवर आवश्यक रस्त्यांचे जाळे ठेवण्यात यावे.
२) सदर फेरबदलाच्या जागेवर १०% खुल्या जागे व्यतिरिक्त १०% अतिरिक्त १०% क्षेत्र सुविधा क्षेत्र म्हणून राखून ठेवून त्यावर किमान प्राथमिक शाळा विकसित करण्यात यावी.

आणि ज्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम-२० चे पोटकलम (३) च्या तरतुदीनुसार शासन अधिसुचना नगर विकास विभाग क्र. टिपीएस-३५०५/१६५१/प्र.क्र.२२/०८/नवि-९, दि. ७ ऑगस्ट, २००८ अन्वये उक्त फेरबदलाबाबत सर्व संबंधितांकडून विहित मुदतीत सुचना / हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता "अधिकारी" म्हणून उपसंचालक नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक यांची नियुक्ती करण्यात आली होती (यापुढे "उक्त अधिकारी" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिका-यांच्या प्राप्त अहवालावर संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त क्षेत्र काही अटींवर औद्योगिक विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे ;

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्या अनुषंगाने प्राप्त अधिकारात शासन उक्त क्षेत्राबाबत उक्त फेरबदल प्रस्तावास पुढीलप्रमाणे सशर्त मंजुरी देत

आहे व त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजूरीची दिनांक १२ नोव्हेंबर, १९९१ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे;

उक्त प्रादेशिक योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल नोंदी खालील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

**नोंद**

"मौजे कुसुंबे येथील गट क्र. २३० मधील २१.२८ हेक्टर क्षेत्र औद्योगिक विभागातून वगळून खालील अटींच्या अधिन राहुन औद्योगिक विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे."

**अट:-**

१) सदर फेरबदलाच्या जागेवर, सहायक संचालक नगररचना, जळगांव शाखा यांच्या सल्लाने आवश्यक रस्त्यांचे जाळे ठेवण्यांत यावे.

२) सदर फेरबदलाच्या जागेवर १० % खुल्या जागे व्यतिरिक्त अतिरिक्त १०% क्षेत्र सुविधा क्षेत्र म्हणून राखून ठेवण्यात यावे. त्यावर ०.४० हेक्टर क्षेत्रावर प्राथमिक शाळा व उर्वरित क्षेत्रावर सांस्कृतिक केंद्र, वाचनालय, पोस्ट ऑफिस, विद्युत उपकेंद्र, शैक्षणिक सुविधा आणि संचालक नगररचना यांच्या मान्यतेने दतर सार्वजनिक सुविधा विकसित करता येतील.

३) जागेचा विकास करतेवेळी जागेतून जाणाऱ्या उत्तर-दक्षिण रस्त्याची किमान रुंदी १८.०० मीटर ठेवण्यात यावी.

**टिप-** (क) उक्त मंजुर फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा नागरिकांच्या अवलोकनार्थ कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये खाली नमूद केलेल्या कार्यालयामध्ये एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

१) जिल्हाधिकारी, जिल्हा जळगांव

२) उपसंचालक नगर रचना, नाशिक विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, आयुक्त, कार्यालय इमारत, नाशिक रोड, नाशिक.

३) सहायक संचालक नगर रचना, जळगांव शाखा, जळगांव

(ख) सदर फेरबदलाची अधिसुचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( प्रदीप गोहिल )**
**कार्यासन अधिकारी**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 13th November, 2009**

**NOTIFICATION**

**The Maharashtra Regional & Town Planning Act. 1966**

No. TPS-3509/1713/CR-257/09/UD-9: Whereas the Regional Plan of Jalgaon – Bhusawal (hereinafter referred to as "the said Regional Plan") has been sanctioned vide Government Notification of Urban Development Department's under section 15(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") vide urban Development Department's Notification No.TPS-3585/116/ CR-165/UD-9, dated 12/11/1991 and came into force with effect from 1st February, 1992 ;

And whereas, in the Peripheral Zone Plan of Jalgaon land bearing Gut No. 230 of mouza Kusumbe is shown in Industrial Zone (hereinafter referred to as "the said Land");

And whereas per provision of section 20(2) the Government is of the opining that the said Land should be deleted from Industrial Zone, and land so released should be included in Residential Zone subject to conditions specified below (hereinafter referred to as "the said Modification")

**Conditions:** 1) Required Road Network shall be provided for the land under Modification
2) In addition to the 10% open space, 10% addition area is to be reserved for amenity space in the land under modification and atleast primary school is to be developed on this amenity space.

And whereas the Notice for the said Modification under the power conferred by section 20 (3) of the said Act, was published inviting suggestion / objections from concerned, and the Dy. Director of Town Planning, Nashik Division, Nashik was appointed as an officer by Government vide Urban Development Department Notification No. TPS-3505/1651/CR-22/08/UD-9, dated 7/8/2008 to hear suggestions / objections received within stipulated period and submit his report to Government (hereinafter referred to as "the said Officer");

And whereas, after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune on the report submitted by the said Officer, Government is of the opinion that the said Land should be deleted from Industrial Zone and land so released should be included in Residential Zone subject to some conditions ;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub-section (4) of Section 20 of the said Act, Government hereby sanctions the said Modification with some conditions and for that purpose amends the above referred Notification dated 12/11/1991;

In the schedule of Modification appended to Notification sanctioning the said Regional Plan following new entry shall be added after last entry-

## ENTRY

"The land bearing Gut No. 230 of Mouza Kusumbe admeasuring 21.28 Ha. is deleted from Industrial zone and land so released is included in Residential Zone as shown on plan subject to following condition."

**Conditions :-**

1) Required road network should be provided for the land under modification in consultation with the Assistant Director of Town Planning, Jalgaon Branch, Jalgaon.

2) In addition to 10% open space, 10% addition area is to be reserve for amenity space in the land under modification. Out of this amenity space 0.40 Hector area is to be developed for primary school and remaining area of the amenity space should be developed for cultural centre, Library, Post Office, Electric Sub-station, Educational amenity and other public amenity with the approval of the Director of Town Planning.

3) While developing the land the minimum width of North – South road passing through this land should be kept as 18.00 mt.

**Note** :- **A)** The copy of part plans showing the said sanctioned modification is kept open for inspection by the public during office hours on all working days for a period of one month at the following offices:-

(1) The Collector of Jalgaon
(2) The Dy. Director of Town Planning, Nashik Division, Nashik, New Administrative Bldg. Commissioner Office compound, Nashik Road, Nashik.
(3) The Assistant Director of Town Planning, Jalgaon Branch, Jalgaon

**B)** This Notification is also available on Department's web site No. www.urban.maharashtra.gov.in.

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**(Pradeep Gohil )**
**Section Officer**